**पीएम श्री (PM Schools for rising India) या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी अनुसूचित जाती उपयोजना घटकाचा तिसरा हाप्ता म्हणून केंद्र हिस्सा व त्यास समरुप राज्य हिस्सा हा निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२४/प्र.क्र.९१/एसडी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २८ मार्च, २०२५

**वाचा:-**

१) केंद्र शासनाचे निधी वितरण आदेश क्र.No.८-२१/२०२४-IS.१९ (GEN-SC), दि.२८.०३.२०२५
२) केंद्र शासनाचे निधी वितरण आदेश क्र.No.८-२१/२०२४-IS.१९ (CAP-SC), दि.२८.०३.२०२५
३) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद यांचे पत्र क्र. मप्राशिप/लेखा/PM SHRI/निधी मागणी/GEN,SC,ST (R/NR)/२०२४-२५/९९६, दि.२८.०३.२०२५
४) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.१०८/अर्थ-३, दि.०८.०१.२०२५
५) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५
६) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७.०३.२०२५
७) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचे परिपत्रक क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.६९/अर्थसंकल्प (विघयो), दि.१८.१०.२०२४

**प्रस्तावना :-**

पीएम श्री (PM Schools for rising India) ही केंद्र पुरस्कृत योजना राज्यात सन २०२२-२३ पासून राबविण्यात येत आहे. या योजनेवरील खर्च केंद्र शासन व राज्य शासनाकडून अनुक्रमे ६०:४० या प्रमाणात केल जातो. संदर्भ क्र.१ व २ येथील आदेशान्वये केंद्र शासनाने अनुसूचित जाती उपयोजना या घटकासाठी सन २०२४-२५ या चालू वित्तीय वर्षातील तिसरा हप्ता राज्याच्या एकत्रित निधीत जमा केला आहे. हा निधी व त्यास समरुप राज्य हिस्सा वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.३ अन्वये शासनास सादर करण्यात आला आहे. त्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

पीएम श्री (PM Schools for rising India) या केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीकरिता केंद्र शासनाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता अनुसूचित जाती उपयोजना घटकाकरीता तिसरा हफ्ता म्हणून उपलब्ध करून दिलेला केंद्र हिस्स्याचा रु.१०,६१,३९,०००/-(अक्षरी रु. दहा कोटी एकसष्ट लाख एकोणचाळीस हजार) इतका निधी व त्यास समरुप राज्य हिस्स्याचा रु.७,०७,५९,३३४/- (अक्षरी रु. सात कोटी सात लाख एकोणसाठ हजार तीनशे चौतीस) इतका निधी असा एकूण रु.१७,६८,९८,३३४/- (अक्षरी रु. सतरा कोटी अडुसष्ट लाख अठ्याण्णव हजार तीनशे चौतीस) इतका निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांना खालीलप्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

अ) केंद्र हिस्सा :-

| **लेखाशिर्ष** | **अर्थसंकल्पीय तरतूद २०२४-२५** | **आतापर्यंत वितरीत केलेला निधी** | **वितरीत करावयाचा निधी** | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | आवर्ती | अनावर्ती | एकूण |
| मागणी क्रमांक एन-०३, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना (०१) अनुसूचित जाती उपयोजना (०१)(०९) राज्यात पी एम श्री शाळा विकसीत करणे (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) (२२०२ के ८६५) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | ४४,१२,३३,००० | १७,८३,५२,००० | ६,१९,६०,००० | ४,४१,७९,००० | १०,६१,३९,००० |

ब) राज्य हिस्सा :-

| **लेखाशिर्ष** | **अर्थसंकल्पीय तरतूद २०२४-२५** | **आतापर्यंत वितरीत केलेला निधी** | **वितरीत करावयाचा निधी** | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | आवर्ती | अनावर्ती | एकूण |
| मागणी क्रमांक एन-०३, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना (०१) अनुसूचित जाती उपयोजना (०१)(१०) राज्यात पीएम श्री शाळा विकसीत करणे (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) (२२०२ के ८७४) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | २९,४१,५६,००० | ११,८९,०१,३३४ | ४,१३,०६,६६७ | २,९४,५२,६६७ | ७,०७,५९,३३४ |

३.   सदर अनुदान सशर्त अनुदान असून यापुर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. या अनुदानाच्या अटी व शर्ती सदर शासन निर्णयात नमूद केल्या आहेत.

४.   सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाच्या दि.१९.०३.२०२५ रोजीच्या निधी वितरण आदेशामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीचे तंतोतंत पालन करण्यात यावे. वरील तक्त्यात दर्शविण्यात आल्याप्रमाणे ज्या घटकांसाठी व ज्या बाबींसाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, त्याच मर्यादेत त्या घटकांसाठी व बाबींसाठी निधी खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.

५.   पीएम श्री (PM Schools for rising India) या योजनेंतर्गत अनुसूचित जाती उपयोजनेवरील खर्च हा Single Nodal Account (SNA) खात्यामधून करण्यात यावा.

६. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकातील व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भाधीन दि.१८.१०.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानूसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

७. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव/कक्ष अधिकारी (रोख/लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तर सह / उप सचिव, शालेय शिक्षण क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधीत आहरणा व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरीत करुन राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद यांच्या अधिनस्थ संबंधित बँक खात्यात जमा करावा.

८. अनुसूचित जाती उपयोजना या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय/ उप लेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व शालेय शिक्षण विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

९. अनुसूचित जाती उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनावर होणाऱ्या खर्चावर सनियंत्रण ठेवता येईल.

१०. अनुसूचित जाती विशेष घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून या योजनेच्या आराखड्यानुसार क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि अनुसूचित जाती उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तीक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

११. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि.०८.०१.२०२५, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५ व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचे दि.१८.१०.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या सुचनानूसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१७१५३९४९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.03.28 17:16:21 +05'30'

**( तुषार महाजन )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
३. मा. उप मुख्यमंत्री (गृह), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. अध्यक्ष, विधानसभा, विधान भवन, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, विधानसभा, विधान भवन, मुंबई.
७. मा. सभापती,विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
८. मा. उपसभापती,विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
९. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई
११. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१५.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१७.राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
१८. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
१९. शिक्षण संचालक माध्य. व उच्च माध्य.), महाराष्ट्र राज्य, पुणे
२०.शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२१. शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
२४. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
२५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२६.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२७.अवर सचिव/ कक्ष अधिकारी, रोख शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२८.अवर सचिव/ कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आवश्यक त्या कार्यवाहीच्या विनंतीसह.
२९.निवड नस्ती (एसडी-६)